# ‘पवित्र नराशंस’ यांचे रहस्य

नराशंसाचे चारही पवित्र वेदांमध्ये वर्णन केलेले आहे. परंतु शेवटची ४००० वर्षे तो म्हणजे एक रहस्य होता. २०व्या शतकापर्यंत त्यांच्या अस्तित्वाची ओळख दाखविण्यासाठी विधान करण्याचा कोणाचाही आत्मविश्वास नव्हता. पण २० व्या शतकात जेव्हा अन्य धर्मांतील ग्रंथ व ज्ञान सहजरित्या उपलब्ध झाले आणि जेव्हा संस्कृत भाषेच्या विव्दानांनी अन्य धर्माच्या ग्रंथाचा अभ्यास केला, तेव्हाच ते अत्यंत आदरणीय धार्मिक व्यक्तिचे ज्याला नरांशस म्हणून संबोधिले जाते त्याच्या अस्तित्वाचे कोडे सोडवू शकले.

ज्या विव्दान व्यक्तिंनी संशोधन केले आहे त्या म्हणजे डॉ. वेदप्रकाश उपाध्याय (संशोधन विव्दान, संस्कृत प्रयाग विश्वविदयालय) डॉ.एम.ए. श्रीवास्तव, पंडीत धरम वीर उपाध्याय इत्यादि.

- पवित्र नराशंसाबद्दल पवित्र वेदामध्ये उपलब्ध असलेला तपशील पुढीलप्रमाणे आहे.
- सर्व म्हणजे चारहि वेदांमध्ये त्याचे नराशंस ह्या नावाने वर्णन केलेले आहे. उदा.

*नराशंस; सुषूदतीम यज्ञमदाभ्यः। कविही मधुहस्तः।*
(ऋग्वेद, हिंदी भाष्य २५,आर्य समाज व्दारा प्रकाशित )

- पवित्र वेदांमध्ये त्याच्याबद्दल पुष्कळ गोष्टींची भविष्यवाणी वर्तविली आहे. काही गोष्टी खाली दिल्या आहेत.

१) पवित्र वेद सांगतात की, तो मृदुभाषी असेल किंवा त्याचे बोलणे ह ` भुरळ पाडणारे असेल (अत्यंत गोड व आकर्षक)

*नराशंसः मिहाप्रियम स्यिन्यज्ञ उप मधुजिव्द दविष्कृतम।*
(ऋग्वेद संहिता १-१३-३)

२) पवित्र वेद असे सागतात की तो आगाऊ भविष्य वर्तवू शकेल

*नराशंसः सुवूदतीम यज्ञमदाभ्य। कविर्ही मधुहस्तः।*
(ऋग्वेद संहिता ५-५-२)

३) त्याला अतिशय आकर्षक व्यक्तिमत्व असेल असे पवित्र वेद सांगतात

*नराशंसः प्रति धामान्यभ्यन तिस्यो दिव प्रति महा स्वर्ची।*
(ऋग्वेद संहिता २-३-२)

४) पवित्र वेद असे सांगतात की पवित्र नराशंस हा मानवजातीचे पापांपासून शुध्दिकरण करील.

*नराशंस वाजिन वायजयन्निह क्षयव्दार पूषणं सुम्नेरीमहे।*
*रथ न दुर्गाद वसवः सुदानवो विश्वस्मान्नो अहसो निष्पिवर्तन।*
(ऋग्वेद संहिता १-१०६-४)

५) पवित्र वेद सांगतात की पवित्र नराशंस हा उंटावर आरुढ ( स्वार ) होईल त्याला १२ बायका असतील.

६) पवित्र वेद सांगतात की, पवित्र नराशंसाची प्रत्येक युगामध्ये लोकांकडून स्तुति केली जाईल.

*इन्द्र जना उप श्रुत नराशंसः स्तविष्यते।*
(अथर्ववेद हिंन्दी भाष्य१४०१)

७) पवित्र वेदांनी असे भाकित केले होते की, ईश्वर हा पवित्र नराशंसाला खालील गोष्टी देईल

१) दहा माळा २) १०० सोन्याची नाणी ३) तीनशे घोडे ४) १०००० गाई

*एश इशाय मामहे शतं निष्कान दश स्त्रजः।*
*त्रीणी शतान्यर्वता सहस्त्रादश गोनाम।*
(अथर्ववेद २०.१२७.३)

८) पवित्र वेद असे सांगतात की, परमेश्वर हा पवित्र नराशंसाचे ६००६० शत्रुंपासून रक्षण करील.

*अनस्वन्ता सतपतिर्मामहे भे गावा चेतिष्ठो असुरों मघोन।*
*त्रैवृष्णों अग्ने दशभिः सहस्त्रैवैश्वानर ऋयरुणाश्चिकेत।*
(ऋग्वेद म.५, सू.२७, मंत्र१)

- अखेरच्या ४००० वर्षापर्यंत लोक हे वरती वर्णन केलेले आकडे व वस्तुस्थिती ह्यांचा कुठल्याही ऐतिहासीक पवित्र व्यक्ति, अवतार किंवा देवता ह्यांच्याशी संबध दाखवू शकले नाहीत.

हल्लीच्या काळात जेव्हा बुद्धिमान व्यक्तिंनी जेव्हा अन्य धर्माचे संशोधन केले तेव्हा इस्लामचे हज़रत मुहम्मद (स.) हेच पवित्र नराशंस आहेत हे त्यांना समजले, ज्यांची भविष्यवाणी ४००० वर्षापुर्वी वेदांमध्ये केलेली होती.

- पवित्र नराशंसाची वेदांमधील भविष्यवाणी ही हज़रत मुहम्मद (स.) ह्याच्याशी पुढील बाबतीत साम्य दाखवुन देते.

१) मुहम्मद (स.) आणि नराशंस ह्या दोन नावातील सारखेपणाः-

नराशंस हे दोन शब्दांचे एकीकरण आहे नर आणि आशन्स. नर म्हणजे मानव प्राणी व आशन्स म्हणजे ‘स्तुती केलेले’. पवित्र वेदांचे स्पष्टीकरण करणाऱ्या महान बुद्धिमान आचार्य सयानचे म्हणणे आहे की, नराशंस म्हणजेच ‘ज्याची मानवप्राण्याकडून स्तुती केली जाते असा’ आचार्य सयानच्या भाषाकोषात नराशंसाचा अर्थ असा लिहीलेला आहे.

*नराशंस यो नरै प्रयशस्यते* (सायन भाष्य ऋग्वेद संहिता ५/५/२)

श्री दयानंद सरस्वती हे पण वरील अर्थाला पुष्टी देतात
(ऋग्वेदः हिंन्दी भाषा, पान २५, प्रकाशक-आर्य समाज)

डॉ. वेदप्रकाश उपाध्याय सांगतात, नर ह्या शब्दाचा उपयोग फक्त मानव प्राण्यासाठी करतात. देवतांसाठी त्यांचा वापर कधीही केला गेलेला नाही. म्हणून पवित्र नराशंसाचा कोणताही देवता म्हणून विचार करणे शक्य नाही. तो मणुष्य असला पाहीजे.

अरेबिक भाषेमध्ये, हम्द म्हणजे स्तुति (प्रशंसा) आणि महंमद म्हणजे 'स्तुती केला गेलेला' म्हणून अरेबीक भाषेतील महमदचा अर्थ हा संस्कृतमधील नराशंसाच्या अर्थाप्रमाणे व सारखा आहे.

२) वेदांतील पहिली भविष्यवाणी असे सांगते. पवित्र नराशंस हा मृदुभाषी किंवा त्यांचे बोलणे अत्यंत गोड असेल.

इतिहासकारांना ठाऊक आहे की, हजरत महंमद(स.) ह्यांचा स्वभाव व संभाषण अत्यंत मृदू व गोड होते.

जास्त ज्ञान मिळवण्यासाठी पुढील दोन पुस्तके जरुर वाचा.

अ) "Life of Muhammad" by sir willan Muir.
(Published by: Smith Elder and Co. London)

ब) "Introduction the speeches of Muhammad"
By Lane Poole (Published by:Macmillan & Co. London)

पवित्र कुराणातदेखील मुहम्मद (स.) ह्यांच्या बाबतीत असे लिहीले आहे.

*''हे मुहम्मद (स.) तुझा स्वभाव अतिशय सौम्य व मधुर आहे. म्हणुनच तुझे सहकारी तुला सोडून जात नाहीत.''* (पवित्र कुराण ३: १५६)

३) पवित्र वेदांची दुसरी भविष्यवाणी असे सांगते की पवित्र नराशंस हा भविष्यकाळात घडणाऱ्या घटनांची भविष्यवाणी करू शकेल.

ते ईश्वराचा प्रेषित असल्यामुळे मुख्य देवदूत जिब्रईल हा नियमितपणे हज़रत मुहम्मद (स.) च्या भेटिस जात होते. पवित्र कुराणाच्या थेट प्रगटीकरण किंवा मुख्य देवदूत जिब्रईल मार्फत हज़रत मुहम्मद (स.) ह्यांना भावी काळासंबंधी नियमितपणे माहिती मिळत होती व ते ती माहिती परिस्थितीनुसार त्यांच्या लोकांपर्यंत पाहोचवीत होते. त्यांच्या (मुहम्मद साहेबांच्या) प्रसिद्ध भविष्यवाणीचे एक उदा. म्हणजे रोमचा पर्शियनवर (ईराणवर) विजय. ६४५ ई. सन मध्ये रोमच्या पराभवानंतर, मुहम्मद (स.) अशी भविष्यवाणी केली होती कि रोम पुन्हा जिंकेल आणि तसेच झाले, रोम लोकांनी ६५० ई. सन मध्ये नईन्वा येथे पार्शियाला पराभूत केले.

४) पवित्र वेदांची चौथी भविष्यवाणी म्हणजे अशी होती की, पवित्र नरशंसाला अत्यंत आकर्षक व्यक्तिमत्व असेल. हज़रत मुहम्मद (स.) ह्यांना अतिशय देखणे व्यक्तिमत्व होते हे एक ऐतिहासिक सत्य आहे.

फक्त हज़रत मुहम्मद (स.) नव्हे तर सर्वसाधारणतः सर्व प्रेषित किंवा अवतार ह्यांच्यावर आकर्षक व्यक्तिमत्वाची मेहेरनजर होती. तसेच त्यांना उत्कृष्ट कौटुंबिक पार्श्वभूमि, उमदे चरीत्र, सोशिकपणा, हुषारी, दूरदृष्टी, कर्तबगारी इत्यादि गोष्टी प्राप्त होत्या, त्यामुळे विश्वास न ठेवणारे वैयक्तिक पातळीवर प्रेषितांना टोमणे मारणे किंवा दोष देणे हे करू शकत नव्हते. भगवान श्री. कृष्ण आणि प्रभू रामचंद्र ह्यांना अत्यंत मोहक व्यक्तिमत्व होते असे म्हटले जाते. श्री. रामचंद्र हे आदर्श पुरूष म्हणून सुद्धा प्रसिद्ध होते.

५) पवित्र वेदांची चौथी भविष्यवाणी अशी होती की नराशंस हा मानव प्राण्यांचे पापांपासून शुद्धिकरण करील.

प्रेषितांचे मुख्य काम म्हणजे मानवजातीचे पापांपासून शुद्धिकरण करणे. व खरोखर हज़रत मुहम्मद (स.) यांनी तसे केले.

पवित्र कुराणात ईश्वर सांगतो,

*''आम्ही हज़रत मुहम्मद (स.) यांना मानवप्राण्यांवर कृपाप्रसाद म्हणून पाठविला आहे. म्हणजेच त्यांना (हजरत मुहम्मदला) यासाठी पाठविले आहे की त्यामुळे मणुष्यप्राणी ह्याला पापविमोचन किंवा मुक्ति मिळेल.''* (पवित्र कुराणः २१:१०७)

६) पवित्र वेदांची ५वी भविष्यवाणी अशी आहे की, नराशंसाला बारा बायका असतील.

ही भविष्यवाणी फक्त हजरत मुहम्मद (स.) ह्यांच्या बाबतीत लागू पडते. आणि अन्य धर्माच्या कोणत्याही धार्मिक व्यक्तिला १२ बायका नव्हत्या (फक्त हज़रत मुहम्मद (स.)) सोडुन त्याच्या १२ बायकांची नावे अशी होती.

१) हज़रत खतिजा (रजि.) २) हज़रत सौदा (रजि.) ३) हज़रत आयेशा (रजि.) ४) हज़रत हफ्सा (रजि.) ५) हज़रत उम्मी सलमा (रजि.) ६) हज़रत उम्मी हबिबा (रजि.) ७) हज़रत झैनाब बिंते हाजास (रजि.) ८) हज़रत झैनब बिंटे खझिमा (रजि.) ९) हज़रत जुन्हेरिया (रजि.) १०) हज़रत सुफिया (रजि.) ११) हज़रत रेहाना (रजि.) १२) हज़रत मयमुन (रजि.)

७) पवित्र वेदांची ५वी भविष्यवाणी असेही सांगते की, नराशंस हा उंटावर स्वार झालेला असेल. हज़रत मुहम्मद (स.) हे सर्व बाजूंनी वाळवंट असलेल्या मक्का आणि मदीना येथे राहत होते, व उंट हा वाळवंटात वाहतूकीचे उत्कृष्ट साधन आहे, त्यामुळे मुहम्मद (स.) हेही उंटावर बसुन प्रवास करीत होते.

ब्राम्हणांना उंटावर बसण्यास परवानगी नसल्यामुळे हे पण एक सूचित करते की नराशंस हा ब्राम्हण नव्हते किंवा भारतांतून नव्हते (पूर्वीच्या काळी राजस्थान हे आजच्यासारखे वाळवंट नव्हते)

८) पवित्र वेदांची ६वी भविष्यवाणी असे सांगते की, पवित्र नराशंसाला लोकसमुहाकडून सन्मान दिला जाईल

डब्लु. एच. हार्ट यांनी "The most 100 influencial persions in history." ह्या शिर्षकाचे एक पुस्तक लिहिले आहे. ह्या पुस्तकांत त्यांनी हज़रत मुहम्मद (स.) यांना प्रथम स्थानावर ठेवले आहे. म्हणजेच इतिहासांतील एक अशी व्यक्ति जिचा ह्या जगावर जास्तीत जास्त प्रभाव आहे व ती म्हणजे हज़रत मुहम्मद (स.)

रोजच्या अजानमध्ये (मशीदीतील प्रार्थना करण्यासाठी दिलेला संदेश) मुसलमान हे हज़रत मुहम्मद (स.) यांचे नाव लाऊडस्पिकरवरून ५ वेळा मोठमोठ्याने सर्व जगभर उच्चारतात.

त्या पाच वेळा म्हणजे सकाळ, दुपार, संध्याकाळ, सुर्यास्तानंतर, रात्री. म्हणुन विश्वात कोठेही या वेळेमध्ये मुहम्मद (स.) नाव घेतले जाते. त्यामुळे मानव जातीत ते अत्यंत स्तुतिपात्र व्यक्ति आहेत.

९) पवित्र वेदांनी असे भविष्य वर्तविले होते की, पवित्र नराशंस ह्याला ईश्वराकडून पुढील गोष्टीचा कृपाप्रसाद मिळेल.

अ) १० माळा ब) १०० सोन्याची नानी
क) ३०० घोडे ड) १०००० गाई

शेवटच्या गेल्या ४००० वर्षांत वर दिलेली भविष्यवाणी म्हणजे बुद्धिमंताना एक कोडे होते. तिचा कोणालाही उलगडा होत नव्हता. हज़रत मुहम्मद(स.) ह्यांच्यावर लक्ष केंद्रित केल्यानंतर ह्या रहस्याचा पुढीलप्रमाणे उलगडा झाला.

• हज़रत मुहम्मद(स.) ह्यांच्याकडे दहा समर्पण केलेले शिष्य होते. ज्यांना 'अश्रा मुबश्शरा' म्हणजे स्वर्गासाठी भविष्य वर्तविलेले असे म्हटले गेले होते.

त्या दहा व्यक्तिंची नावे अशी आहेत.

१) हज़रत अबुबकर (रजि.), २) हज़रत उमर (रजि.), ३) हज़रत उस्मान (रजि.), ४) हज़रत अली (रजि.), ५) हज़रत तलहा (रजि.), ६) हज़रत सादबिन वक्वास (रजि.), ७) हज़रत सादबिन झैड (रजि.), ८) हज़रत अब्दुल रहमान बिन औफ (रजि.), ९) हज़रत अबू उबैदा बिन जररा (रजि.), १०) हज़रत झुवेर (रजि.)

हे दहा लोक अत्यंत कट्टर अनुयायी होते. आणि प्रेषित हज़रत मुहम्मदसाठी(स.) त्यांचे प्राण देण्यास उत्सूक होते. ते नेहमी त्याच्या सहवासात राहण्याचा प्रयत्न करीत होते. म्हणून त्यांना माळा असे संबोधन प्राप्त झाले आहे.

• हज़रत मुहम्मद (स.) ह्यांचे १०० अनुयायी होते. ज्यांनी त्यांचा देश, कुटूंबिय, व्यवसाय ह्या सर्वांचा त्याग करून सोडला व ते नेहमी प्रेषित मुहम्मद(स.)च्या भोवती मशिदीजवळ राहात असत. त्यांना असहाबे-सुफ्फा असे म्हटले गेले.

ह्या १०० अनुयायांनी त्यांचे जीवन इस्लाम धर्माची शिकवण शिकण्यासाठी व इतरांना शिकविण्यासाठी अर्पण केले होते. ते इस्लाम धर्माचा प्रसार करण्यात अत्यंत महत्वपूर्ण असल्यामुळे त्यांना म्हणुनच 'सोन्याची नाणी' असे म्हटले गेले होते.

• सुरूवातीला मक्केच्या रहिवाशांनी व्यक्तिगत पातळीवर मुस्लिम व इस्लाम ह्यांचा शेवट करण्याचा प्रयत्न केला. म्हणुन हज़रत मुहम्मद (पीबुह) मदिना ह्या सुरक्षित जागी स्थलांतर करून गेला व त्या ठिकाणाहून त्याने ईश्वराचा संदेश पसरविण्याची त्याची जबाबदारी चालू ठेवली. यावेळी सुमारे १००० मक्काच्या शिपायांनी मदिनावर इस्लाम व मुस्लिम ह्यांचा शेवट करण्यासाठी आक्रमण केले. त्यांचा प्रतिकार करण्यासाठी सुमारे ३१३ अनुयायी व हज़रत मुहम्मद(स.) ह्यांनी १००० शिपायांशी लढा दिला व त्यांना पराभूत केले.

त्या ३१३ लोकांनी धैर्य आणि शौर्य ह्यांचा वापर करून लढा दिला व घोडा हा सुद्धा धैर्य आणि शौर्य ह्यांची निशानी आहे. त्यामुळे वेदांमध्ये भविष्य सांगीतल्याप्रमाणे त्या ३०० लोकांना ३०० घोडे म्हणुन संबाधिले जाते.

• हज़रत मुहम्मद(स.) मक्केतुन स्थलांतरानंतर मदीनामध्ये होते. त्यावेळी मदिना व मक्का या दोन शहरात शांतीचा करार होता. पण जेव्हा मक्केच्या लोकांनी हज़रत मुहम्मद(स.) यांनी केलेला शांतीचा करार भंग केला, त्यामुळे त्यांनी १०,००० शिष्य गोळा केले आणि मक्केच्या दिशेने कूच केले. युद्ध किंवा रक्ताचा एकही थेंब न सांडता त्यांनी मक्कावर विजय मिळवला. त्या १०,००० अनुयायांनी कधीही कुणाचे नुकसान केले नाही व गायदेखील कधीही कोणाला त्रास देत नाही. त्यामुळे त्यांना भविष्यवाणीत १०,००० गाई असे म्हटले गेले आहे.

• प्रेषित हा फक्त उपदेश करू शकतो. तो इस्लामची शिकवण समजुन घेणे व तिचा पाठपुरावा करणे ह्यासाठी शहाणपण देऊ शकत नाही. फक्त ईश्वरच हे काम करू शकतो. म्हणुन १० अश्रा मुबश्शरा १०० असहाबे-सुफ्फा, ३१३ सैनिक (रक्षणकर्ते) व १०,००० अनुयायी ह्यांनी जे काही कार्य केले ते ईश्वराने दिलेल्या त्या सर्वांना दिलेल्या शहाणपणामुळे होते. म्हणजे आपण असे म्हणु शकतो की, ईश्वराने त्यांना (पवित्र नराशंस किंवा हज़रत मुहम्मद(स.) वर वर्णन केलेल्या लोकांची देणगी दिली होती.

१०) पवित्र वेदांनी असे भविष्य वर्तविले होते की, ईश्वराने पवित्र नराशंसाचे ६०,०९० क्षत्रूंपासुन रक्षण केले.

जेव्हा मक्केच्या लोकांना इस्लामचा प्रसार थांबविने किंवा कमी करण्यात अपयश आले तेव्हा त्यांनी हज़रत मुहम्मद(स.) यांना ठार मारण्याची योजना आखली. एका रात्री ४० कुटुंबातील ४० योद्धांनी हज़रत मुहम्मद(स.) ह्यांच्या घराला वेढा दिला. त्यामुळे जेव्हा ते सकाळी घराबाहेर येतील, तेव्हा त्याला ठार मारण्यात येईल अशी त्यांची योजना होती. त्या रात्री हज़रत मुहम्मद(स.) हे घराबाहेर आले, पण योद्धे त्यांना पाहू शकले नाहीत. ते त्यांच्या मधून गेले व त्यांनी मदिनेला स्थलांतर केले.त या वे ळी मक्केची लोकसंख्या ही सुमारे ६०,००० होती व ते सर्व हज़रत मुहम्मद(स. ) शत्रू होते. हज़रत मुहम्मद(स.) यांनी मक्केतुन मदिनेला सुरक्षीत स्थलांतर केले. हा एक रहस्यमय चमत्कार होता आणि हे सर्व ईश्वरी कृपेने झाले. म्हणुन ईश्वर म्हणतो की, त्याने पवित्र नराशंसाला ६००९० शत्रुंपासून वाचविले.

• वर दिलेल्या तपशील आणि आकडेवारीवर आधारीत डॉ. वेद प्रकाश उपाध्याय, डॉ. एम.ए. श्रीवास्तव, पंडीत धर्मवीर उपाध्याय व इतर विद्वान सांगतात की, पवित्र नराशंस आणि हज़रत मुहम्मद(स.) हे एकच व्यक्ति आहेत.

• नराशंस, कलकी अवतार व मुहम्मद(स.) ह्यांचा सविस्तर आणि सखोल ज्ञानासाठी कृपया पुढील पुस्तकांचा संदर्भ म्हणुन वापर करा.

१. Kalki Autar and Hazrat Muhammad (pbuh),
by Dr. Ved Prakash Upadhyay,

Publisher:-Jamhoor Book Depot, DEOBAND. (U.P) Pin: 247554

2. Narashansa aur Antim Rishi, by Dr. Ved Prakash Upadhyay Publisher:-Jamhoor Book Depot, DEOBAND. (U.P) Pin: 247554

3. Muhammad (pbuh) aur Bhartiya Dharm Granth, by Dr. M.A. Shrivastav Publisher:- Madhur Sandesh Sangam, E-20, Abul Fazl Enclave, Jamia Nagar, New Delhi-110025. E-mail: madhursandeshsangam@yahoo.com

4. Muhammad (pbuh) in World Scripture, by A. H. Vidyarthi Publisher: Adam Publishers & Distributors, 1542, Pataudi House, Darya Ganj, New Delhi-110002. www.adambooks.com

5- Muhammad in the Hindu Scriptures Author- Dr. Ved Prakash Upaddhay Publisher: A.S. Noordeen, P.O. Box 10066 50704 Kuala Lumpur. Tel:- 03-40236003 Fax :- 03-40213675. E-mail- asnoordeen@yahoo.com, holybook@tm.net.my

पवित्र नराशंस आणि हज़रत मुहम्मद(स.) या दोघांतील एकसारखेपणा यावर आपण चर्चा केली. परंतु कोणीही म्हणू शकेल कि वरील चर्चा केवळ कल्पणा आहे, आणि यावर काहीही भक्कम पुरावा नाही कि पवित्र नराशंस हेच मुहम्मद(स.) आहेत किंवा हज़रत मुहम्मद यांचाच उल्लेख पवित्र वेदांमध्ये केलेला आहे.

हज़रत मुहम्मद(स.) यांच्याबद्दल हिंदु धर्मातील पवित्र ग्रंथात उल्लेख आहे हे सिद्ध करण्यासाठी खालील पवित्र श्लोकांचा आपण अभ्यास करूया.

• भविष्यपुराण असे सांगते, "दुसऱ्या एखादच्या देशात प्रेषित हा त्याच्या अनुयायांबरोबर येईल. त्याचे नाव मुहम्मद असेल व तो वाळवंटी प्रदेशात प्रगट होईल."

*एतस्मिन्नन्तिरे म्लेच्छ आचार्यण समान्वितः।*
*महामद इति ख्यातः शिष्यशाखा समन्वितः।*
(भविष्यपुराण पर्व ३, खंड-३, अध्याय ३, श्लोक-५)

पंडीत धर्मवीर उपाध्याय ह्यांनी " अंतिम ईश्वर दूत" नावाचे प्रसिद्ध पुस्तक लिहीले, जे १९२३ मध्ये नॅशनल प्रिंटीग प्रेस, दर्यागंज नवी दिल्ली ह्यांनी प्रकाशीत केले. ह्या पुस्तकामध्ये ते असे लिहीतात की, काग- बुसंडी आणि गरूड हे श्रीरामाच्या सहवासात बराच काळ राहीले आणि त्यांनी श्री रामाचे उपदेश स्वतःही मानले व ते सर्वसाधारण लोकांपर्यंत पोहोचविले. तुलसीदासजींनी त्यांच्या उपदेशाचे भाषांतर संग्रामपुराण या पुस्तकात केले आहे. त्यांनी असे लिहीले की, भगवान शंकरजींनी त्याच्या मुलाला भावी काळातील धर्माची भविष्यवाणी पुढील शब्दात सांगितली होती.

| | |
|---|---|
| यहां न पक्षपात कछु राखहुं<br>वेद, पुराण, संत मत भाखहुं । | कोणताही पक्षपात न करता मी संत. वेद आणि पुराणे ह्यांची शिकवण स्पष्ट करून सांगतो. |
| संवत विक्रम दोऊ अनङ्ग ।<br>महाकोक नस चतुर्पतङ्ग | तो सातव्या विक्रम संवत्सरांत चार ताऱ्याच्या (सुर्य) उदयाबरोबर जन्माला येईल. |
| राजनीति भव प्रीति दिखावै<br>आपन मत सबका समझावै । | तो राज्य करणारा लायक असेल, तर्क, प्रेम व शहानपणा या बळाच्या जोरावर तो त्याची शिकवण पटवुन देईल. |
| सुरन चतुसुदर सतचारी ।<br>तिनको वंश भयो अति भारी | त्यांचे चार मुख्य अनुयायी असतील, त्यामुळे त्यांच्या अनुयायात वाढ होईल |
| तब तक सुन्दर मद्दिकोया ।<br>बिना महामद पार न होया । | जोपर्यंत स्वर्गीय ग्रंथ हा पृथ्वीवर असेल मुहम्मद शिवाय मुक्ति मिळणार नाही. |
| तबसे मानहु जन्तु भिखारी ।<br>समस्थ नाम एहि व्रतधारी । | लोक, कीटक आणि प्राणि हे त्याचे (मुहम्मदचे)नाव घेतल्यानंतर ईश्वराचे आज्ञापालक बनतील. |
| हर सुन्दर निर्माण न होई<br>तुलसी वचन सत्य सच होई । | त्यानंतर, त्याच्यासारखा कोणीही जन्माला येणार नाही. तुलसीदास जे सांगतो ते खरे होईल. |

(संग्राम पुराण, खंड-१२, कांड-६, पद्यानुसार गोस्वामी तुलसीदास हजरत मुहम्मद (स.) आणि भारतीय धर्मग्रंथ लेखक डॉ. एम.ए.श्रीवास्तव, पान क्र.१८)

इति अल्लोपनिषदांतील भविष्यवाणी

नागेंद्र नाथ बासू ह्यांनी संपादित केलेल्या विश्वकोशाच्या दुसऱ्या भागात अंतिम संदेशहवाकाचे भविष्य खालीलप्रमाणे वर्तविली आहे.

| | |
|---|---|
| आदल्ला बूक मेककम्<br>अल्लबूक निखादकम् ।।४ । | ह्या श्लोकाचे भाषांतर करता येणे शक्य झाले नाही. |
| अला यज्ञन हुत हुत्वा अल्ला ः<br>सूर्य्य चन्द्र सर्वनक्षत्राः ।।५। | याग युगापासुन ईश्वराची प्रार्थना केली जाते.सूर्य चंद्र आणि तारे हे ईश्वरामुळे आहेत. |
| अल्लो ऋषीणां सर्व दिव्यां इन्द्राय<br>पूर्व माया परमन्तरिक्षा ।।६।। | ईश्वर हा ऋषींचा (संताचा) तो आहे. तो इंद्रापेक्षाहि महान आहे व ह्या अंतरिक्षपेक्षाही रहस्यमय आहे. |
| अल्लः पृथिव्या अन्तरिक्ष्ञं<br>विश्वरुपम् । ७।। | ईश्वर हा पृथ्वी, आकाश व विश्वाच्या सर्व वस्तुमध्ये दृश्यमान आहे. |
| इल्लांकबर इल्लांकबर इल्लां<br>इल्लल्लेति इल्लल्लाः ।।८।। | ईश्वर हा महान आहे, ईश्वर हा महान आहे कोणीही त्याच्या तोडीचा नाही. |
| ओम् अल्ला इल्लल्ला अनादि । | ओम म्हणजे अल्लाह. आपण त्याची सुरूवात आणि शेवट ह्याचा अंदाज करू शकत नाही. आपण दुष्टांपासून रक्षण करण्यासाठी अशा ईश्वराची प्रार्थना करतो. |

| | |
|---|---|
| दे स्वरुपाय अथर्वण श्यामा हुह्री जनान पशून सिध्दान ः जलवरान् अदृष्टं कुरु कुरु फट ।।९ | हे ईश्वर। दुष्ट गुन्हेगार, धार्मिक लोक जे लोकांची दिशाभूल करतात. त्याचा नाश कर आणि पाण्यातील नुकसान करणाऱ्या किटांणुपासुन (Evil Creature of Water) आमचे रक्षण कर. |
| असुरसंहारिणी हूं ह्रीं अल्लो रसूल महमदरकबरस्य अल्लो | ईश्वर हा दुष्ट शक्तिंचा नाश करणारा आहे मुहम्मद हा महान ईश्वराचा प्रेषित आहे. |
| अल्लाम् इल्लल्लेति इल्लल्ला ।।१०।। | ईश्वर हा ईश्वर आहे. त्याच्यासारखा दुसरा कोणीही नाही. |

(इति अल्लोपनिषद हजरत मुहम्मद(स.) आणि भारतीय धर्मग्रंथ. लेखक- डॉ. एम.ए. श्रीवास्तव, पान नं.३०)

गोरखपुर येथुन गीता प्रेसने प्रकाशित केलेले कल्याण मॅगझिन ह्यामध्ये उपनिषदांक ह्या खास अंकामध्ये २२० उपनिषदांत अल्लोपनिषद ह्याचा संदर्भ १५ व्या ठिकाणी आहे. डॉ. वेदप्रकाश उपाध्याय ह्यांनी पण आपल्या प्रदिप प्रकाशनने १९८९ मध्ये प्रसिद्ध केलेल्या वैदिक साहित्य एक विवेचन ह्या पुस्तकात अल्लोपनिषदाचे वर्णन केले आहे.

- पवित्र वेद हे सुमारे ४००० वर्षापुर्वीचे जुने आहेत. जी स्वर्गीय पुस्तके वेदांच्यानंतर प्रगट (प्रसिद्ध) झाली. त्यांनी पण नराशंस किंवा हज़रत मुहम्मद (स.) ह्यांची भविष्यवाणी खालील शब्दांत केली आहे.

## • यहुदी धर्मातील भविष्यवाणी :-

मी तुझ्याचसारखा (मॉसेससारखा) दुसरा प्रेषित त्याच्या भाईबंदामधुन उभा करेन व माझे शब्द त्याच्या मुखामध्ये घालीन व मी जसा हुकुम दिला आहे त्यानुसार तो त्याच्या बांधवाशी बोलेल.

( ओल्ड टेस्टामेंट डिओटिरोनॉमी १८:१८)

## • खिश्चन धर्मातील भविष्यवाणीः-

येशू खिस्ताने पवित्र बायबलमध्ये असे म्हटले आहे, मी तुम्हाला पाण्याच्या बरोबर खिस्ती धर्माची दीक्षा देऊन पश्चातापाची भावना निर्माण करत आहे. पण माझ्यानंतर जो येणार आहे तो माझ्यापेक्षा अत्यंत सामर्थ्यवान असेल व त्याचे जोडे धारण करण्याचीही माझी लायकी असणार नाही. तो तुम्हाला पवित्र देवदूत व पवित्र अग्नि ह्यांनी धर्माची दीक्षा देईल.

(सेंट मॅथ्यू ३:११)

- बायबल हे मुळांत हर्ब्यु भाषेमध्ये प्रसिद्ध केले गेले आहे. हर्ब्यु भाषेतील ओल्ड टेस्टामेंट मधील पुस्तक सोलमेन ह्यामधील प्रकरण क्र.५ श्लोक १६ असे सांगतो.

*हिक्को मोमिट्टाकिम वे कुल्लो मुहम्मदीन झेडदूदेह वा झेअरई बायना जेरूसलेम*

(ओल्ड टेस्टामेंट, बुक सोलमेन, प्रकरण ५ श्लोक क्र. १६)

त्यांचे मुख अत्यंत सुंदर आहे, होय तो खरोखरच सुरेख आहे, मुहम्मद माझा आवडता आहे व माझा दोस्त आहे. हे जेरूसलेमच्या कन्यांनो! समजले का? (हर्ब्युमध्ये इम हे नावाला मान व्यक्त करण्यासाठी जोडले जाते. म्हणून मुहम्मद यांना महम्मदिम असे संबोधिले गेले आहे.)

## • बोद्ध धर्मातील भविष्यवाणी :-

पवित्र कुराण असे सांगते, गौतमबुद्ध हा २३ वा अवतार आहे. त्याने त्याचा शिष्य नंदाला सांगीतले आहे.

*"हे नंदा! मी या जगातील पहिला बुध्द नाही किंवा अखेरचा बुद्ध नाही. योग्यवेळी या जगात एक बुद्ध अवतरेल. जो सत्य आणि दानधर्म ह्यांची शिकवण देईल त्याचे अंतकरण स्वच्छ असेल. त्याची मनोवृत्ति ही शुद्ध आणि पवित्र असेल. तो विव्दान व शहाणा असेल. तो सर्व मानवांचा मार्गदर्शक आणि नेता असेल. मी ज्याप्रमाणे सत्य आचरणाची शिकवण दिली. त्याचप्रमाणे तो सत्याची शिकवण देईल. तो जगाला जीवनाचा शुद्ध आणि सर्व दृष्टींनी परिपूर्ण असा मार्ग दाखविल. हे नंदा! त्याचे नाव मैत्रेय असे असेल."* ( गॉसपेल ऑफ बुद्ध; कर्ता-करूस, पान २१७)

- डॉ. वेदप्रकाश ह्यांनी त्यांच्या पुस्तकांत असे सिद्ध करून दाखविले आहे. (दोन पुस्तकांचा आधीच उल्लेख केलेला आहे.) की सर्व पवित्र धर्मग्रंथातील भविष्यवाणी ही पवित्र नराशंस किंवा मुहम्मद यांच्यासाठी आहेत.

## • हे सर्व लिहीण्यामागचा हेतू काय आहे?

जर आपण एखाद्या परकिय देशांत गेलो जेथे प्रत्येकजण हा आपणास नविन आणि परका आहे. व आपणास असे कळून आले कि, त्यांच्यामध्ये आपल्या देशांतुन आलेला एकजण आहे. तर अशा व्यक्तिशी परिचय नसून देखील तिच्याविषयी आपणास मित्रत्व, सहानुभूती वाटते आणि आपण त्या व्याक्तिकडे आकर्षित होतो. कारण ती व्यक्ति आणि आपणामध्ये सर्वसाधारण जोडणारा एक दुवा असतो व ती म्हणजे आपली मातृभुमी.

ही काहीतरी साधर्म्य असणारी भावनाच दोन परक्या माणसांतील अंतर कमी करते. त्याचप्रमाणे आपण जर आपला धर्म व अन्य धर्म ह्यांमधील जर काही समान गोष्टी शिकलो तर आपापसातील ही परकेपणाची भावना कमी होईल.

आता आपणास ठाऊक आहे की, हिंदुचा पवित्र नराशंस आणि मुसलमानाचा हजरत मुहम्मद (स.) हे एकच आणि समान आहेत. ही समानतेची भावनाच हिंदु, मुस्लिम ह्यांच्यामधील व्देष आणि अंतर कमी करण्यास मदत करील.

आपण ह्या ज्ञानाचा प्रसार हा सर्वसामान्य मानवांमध्ये आपापसांतील तिरस्कारांची भावना कमी करण्यासाठी करू या व या मानवजातीत आणि जगात शांती आणि भरभराट आणु या!

## MR. Q. S. KHAN

### IS ALSO AUTHOR OF FOLLOWING BOOKS.

1. Introduction to Hydraulic Presses.
2. Design and Manufacturing of Hydraulic cylinders.
3. Study of Hydraulic Valves, Pumps and Accumulators.
4. Study of Hydraulic Accessories
5. Study of Hydraulic Circuit
6. Study of Hydraulic Seals, Fluid Conductor, and Hydraulic Oil.
7. Essential knowledge required for Design and Manufacturing of Hydraulic Presses.
8. Law of success for both the Worlds.
   (This book is also translated in Marathi language with title "Yashachi Gurukilli")
9. Hajj. Journey Problems and their easy Solutions.
   (This book is translated in Urdu, Hindi, Gujarati, and Bengali languages)
10. Teachings of Vedas and Quran

ALL ABOVE BOOKS ARE AVAILABLE FOR FREE READING ON:

www.scribd.com

www.freeeducation.co.in